# महाराष्ट्र विधानपरिषद

## चौथे (हिवाळी) अधिवेशन, २०१९

---

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

---

### शिक्षणाधिकारी (माध्यमिक) जिल्हा परिषद, सोलापूर यांचे कार्यालयातील नियुक्त शिक्षकांच्या प्रलंबित वैयक्तिक मान्यतेच्या प्रस्तावाबाबत

**(१) १५७२ (२१-०१-२०१५). श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) दिनांक २ मे, २०१२ पूर्वीच्या भरतीबंदी आदेशाच्या अगोदर सोलापूर जिल्हा परिषदेच्या माध्यमिक शिक्षण विभागात नियुक्त शिक्षकांच्या सुमारे ६०० वैयक्तिक मान्यतेच्या नस्ती शिबिरामध्ये दाखल करुनही प्रलंबित आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय व तद्नुषंगाने नस्त्या प्रलंबित ठेवण्याचे कारण काय आहे,

(३) तसेच प्रलंबित ठेवणाऱ्या तत्कालिन सक्षम अधिकाऱ्यांची नावे काय आहेत व त्यांच्यावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**ॲड. आशिष शेलार (१६-०७-२०१९) :** (१) अंशत: खरे आहे.
(२) व (३) तत्कालिन शिक्षणाधिकारी, उपशिक्षणाधिकारी व अधिक्षक, शिक्षण विभाग (माध्यमिक), जिल्हा परिषद, सोलापूर यांचेविरुध्द चौकशी सुरु करण्यात आली आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## लोणावळा ते दौंड या मार्गावर लोकल रेल्वे सेवा सुरू करण्याबाबत

**(२) ३१८५ (०९-०४-२०१५). डॉ.सुधीर तांबे** : सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) पुणे शहरात दिवसेंदिवस लोकसंख्या वाढ होत असल्याने त्याचा परिणाम वाहतूक व्यवस्थेवर होत असल्याने लोणावळा ते दौंड या मार्गावर लोकल रेल्वे सेवा सुरू करण्यासाठी राज्य शासन केंद्र शासनाकडे पाठपुरावा करणार आहे काय,
(२) अद्याप कोणतीच कार्यवाही केली नसल्यास, त्याची कारणे काय आहेत,
(३) तसेच प्रश्न १ बाबत शासनाची स्पष्ट भूमिका काय आहे ?

**श्री.दिवाकर रावते (११-०३-२०१९) :** (१) पुणे शहरात दिवसेंदिवस लोकसंख्या वाढ होत असल्याने त्याचा परिणाम वाहतूक व्यवस्थेवर होत असल्याने लोणावळा ते दौड लोकल सेवा सुरु करण्यासाठी रेल्वे मंत्रालयास विनंती करण्यात आली आहे.
(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## श्री.राजेंद्र देवकाते, न.का.वराडकर कला वाणिज्य महाविद्यालय (दापोली, जि.रत्नागिरी) यांच्या मान्यतेबाबत

**(३) ३२७१ (२०-०४-२०१५). श्री.नागोराव गाणार** : सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) श्री.राजेद्र देवकाते, न.का. वराडकर कला वाणिज्य महाविद्यालय (दापोली, जि.रत्नागिरी) यांच्या मान्यतेबाबत शाळा न्यायाधिकरणाने दिनांक २० फेब्रुवारी, २००६ रोजी शिक्षण विभागास दिलेल्या निर्देशाचे स्वरूप काय होते,
(२) मा.शाळा न्यायाधिकरण कोल्हापूर यांनी दिलेल्या निर्देशाविरूध्द शासनाने मुंबई उच्च न्यायालयात आव्हान याचिका दाखल केली होती, हे खरे आहे काय,
(३) नसल्यास, न्यायालयाचा निकाल बंधनकारक असूनही न्यायालयीन निर्देशाप्रमाणे कार्यवाही न करण्याची कारणे काय आहेत,
(४) याबाबत महाराष्ट्र राज्य शिक्षक परिषदेचे कार्याध्यक्ष व कोकण विभाग शिक्षक मतदार संघाचे लोकप्रतिनिधींनी दिनांक १७ जून, २०११ रोजी दिलेल्या निवेदनाच्या अनुषंगाने काय कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, लोकप्रतिनिधीच्या पत्राची दखल न घेण्याची तसेच न्यायालयीन आदेश डावलण्याची कारणे काय आहेत ?

**ॲड. आशिष शेलार (१६-०७-२०१९) :** (१) मा.शाळा न्यायाधिकरणाने दिनांक २७/०२/२००६ रोजी दिलेले आदेश थोडक्यात पुढीलप्रमाणे आहेत. आदेशानुसार अपिलार्थीचे अपील मान्य करण्यात येऊन अंतरिम स्थगिती आदेश कायम केले आहेत. वादीचे अर्धवेळसेवेचे सातत्य ठेवावे व सेवासमाप्ती पासून अर्धवेळ सेवेची थकबाकी द्यावी तसेच वर्कलोडनुसार व त्यांच्या विषयानुसार भविष्यात पूर्णवेळ पद निर्माण होईल त्यावेळी वादी यांना नियुक्त करावे.
(२), (३), (४) व (५) मा.शाळा न्यायाधिकरणाच्या आदेशानुसार श्री.देवकाते यांना १९९७-९८ ते २००६-०७ या कालावधीसाठी अर्धवेळ मान्यता देण्यात आलेली असून वेतनाबाबत शासन निर्णय दिनांक २१/०५/२०१४ नुसार कार्यवाही करण्यात आलेली आहे.

---

## राज्यातील महत्वाच्या बंदराचे खाजगीकरण करण्याचा निर्णय घेतल्याबाबत

**(४) ८४२४ (०६-०८-२०१५). श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील अत्यंत महत्वाच्या बंदराचे खाजगीकरण करण्याच्या निर्णयाला कामगारांचा विरोध आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, यासंदर्भात कामगारांची भूमिका काय आहे,
(३) तसेच, याबाबत शासनाची भूमिका काय आहे ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०३-०९-२०१९) :** (१) मोठी बंदरे केंद्र शासनाच्या अखत्यारित आहेत.
(२) प्रश्न उद्भवत नाही.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सावली, आगरदांडा, नांदले, जमुतखार, उसडी, टोकेखार (ता.मुरुड, जि.रायगड) या गावातील रस्त्याची दुरवस्था झाल्याबाबत

**(५) १०५९९ (३१-०७-२०१५). श्री.हेमंत टकले :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सावली, आगरदांडा, नांदले, जमुतखार, उसडी, टोकेखार आदी (ता.मुरुड, जि.रायगड) गावातील रस्त्यांना खड्डे पडल्याने तेथील वाहकांना तसेच नागरीकांना त्रास सहन करावा लागत आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, याबाबत सार्वजनिक बांधकाम विभाग अलिबाग, जि.रायगड यांच्याकडे अनेकवेळा तेथील जनतेने तक्रारी करुनसुध्दा कोणतीच कार्यवाही केली नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास तेथील नागरीक जनता व वाहनचालकांची होणारी गैरसोय दूर करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०३-०९-२०१९) :** (१) होय.
(२), (३) व (४) दिघी बंदराकडे जाणारे रस्ते महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडून पुनश्च सार्वजनिक बांधकाम विभागाकडे हस्तांतरित करण्याबाबतच्या प्रस्तावास, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डामार्फत दुरुस्तीसाठी निधी उपलब्ध करुन

देण्यात येईल या अटीवर मान्यता देण्यात आली आहे. तसेच दिघी बंदराला जोडणारे रस्ते राज्यमार्ग क्रमांक ९२, ९६ व ९७ हे रस्ते सार्वजनिक बांधकाम विभागाकडून मेरीटाईम बोर्डाकडे हस्तांतरित करण्याबाबत केलेला दिनांक २५/०२/२०१५ चा MOU आणि त्यानंतर महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डा व दिघी पोर्ट लि. यांच्यामध्ये स्वाक्षांकीत करण्यात आलेले दिनांक ०७/०४/२०१५ रोजीचा करारनामा कायदेशीररित्या रद्द करण्याची कार्यवाही करण्यात येत आहे.

---

## मुंबई महानगरपालिका भागातील भाज्यांमध्ये जास्त प्रमाणात किटकनाशकांचा वापर केल्याबाबत

**(६) १३४९३ (२१-१२-२०१५). श्रीमती विद्या चव्हाण** : सन्माननीय **कृषी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) केंद्र शासनाच्या कृषी खात्याने मुंबई महानगरपालिका भागातील भाज्यांमध्ये असलेल्या किटकनाशकांच्या प्रमाणाची तपासणी केली, त्यापैकी परवानगीशिवाय जास्त किटकनाशके असलेल्या भाज्यांचे प्रमाण ५६% असल्याचे माहे ऑक्टोबर, २०१५ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर प्रकरणी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. अनिल बोंडे (१६-१०-२०१९) :** (१) हे अंशत: खरे आहे.

(२) किटकनाशकांचा गरजेनुसार कमीत कमी, योग्य प्रमाणात व लेबल क्लेमप्रमाणे वापर करण्याबाबत प्रचलीत असलेल्या योजनेतून शेतकऱ्यांमध्ये जागृती करावी अशा सूचना सर्व संबंधितांना देण्यात आल्या आहेत.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात सहकारी तत्वावर वीज वापर संस्था निर्माण करण्याबाबत

**(७) १५०१० (२७-०४-२०१६). डॉ.सुधीर तांबे :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात सहकारी तत्वावर वीज वापर संस्था निर्माण करण्याचे शासनाचे धोरण काय आहे,

(२) असल्यास, सहकारी तत्वावर वीज वापर संस्था निर्माण करण्याचा निर्णय घेण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (०९-०५-२०१९) :** (१) व (२) राज्यात सहकारी तत्वावर वीज वापर संस्था निर्माण करण्याचे कोणतेही धोरण सद्य:स्थितीत शासनाच्या विचाराधीन नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील जिल्हा परिषद शाळांच्या भूखंडावर अतिक्रमणे झाल्याबाबत

**(८) १५६५४ (०२-०५-२०१६). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील जिल्हा परिषद शाळांच्या ताब्यात असलेल्या हजारो एकर जागेवर अतिक्रमणे झाल्याचे माहे डिसेंबर, २०१५ च्या शेवटच्या आठवड्यात निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यातील जिल्हा परिषदेच्या शाळांच्या ताब्यात एकूण किती जमीन आहे,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने पाहणी केली आहे काय, पाहणीचे निष्कर्ष काय आहेत व राज्यातील जिल्हा परिषदेच्या शाळांच्या जमिनीवरील अतिक्रमणे निष्काषित करणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (२४-०७-२०१९) :** (१) होय, हे अंशत: खरे आहे.
(२) राज्यातील जिल्हा परिषद शाळांच्या ताब्यात सुमारे २१,३६१.२१ हेक्टर जमीन आहे.
(३) होय, जिल्हा परिषद शाळांच्या जमिनीवरील अतिक्रमणे हटविण्याबाबत न्यायालयात खटले दाखल केले आहेत. तसेच, जिल्हा प्रशासन, ग्रामपंचायत व जिल्हा परिषद स्तरावरुन कार्यवाही सुरु आहे.

उस्मानाबाद व धुळे जिल्ह्यात पोलीस ठाण्यात गुन्हे दाखल करण्यात आली आहेत.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पुणे येथील सह्याद्री मल्टी स्पेशालिटी रुग्णालयात डेंग्यूबाधित रुग्णाची आर्थिक लूट केल्याबाबत

**(९) १७०६६ (०२-०५-२०१६). ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) पुणे येथील डेक्कन परिसरातील सह्याद्री मल्टी स्पेशालिटी हॉस्पिटलने डेंग्यूबाधित रुग्णांच्या उपचाराचे देयक सव्वा सात लाख रुपये केल्याने रुग्णाला घर आणि दागिने गहाण ठेवावे लागल्याचे माहे जानेवारी, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त रुग्णाला हॉस्पिटलमधील केमिस्टकडूनच जबरदस्तीने औषधे खरेदी करावयाची ५१ हजारांचे इंजेक्शन ९७ हजाराला दिले या कारणास्तव सदरहू रुग्णाची लुट करण्यात आली आहे, सदर प्रकरणी शासनाने कोणती चौकशी केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (०८-०८-२०१९) :** (१) हे खरे नाही.
(२) व (३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मानसिक वेदना घालविण्यासाठी ओपिऑईड औषधाचा उपयोग करीत असल्याबाबत

**(१०) १८२१४ (०४-०५-२०१६). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, डॉ.सुधीर तांबे :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मानसिक वेदना घालविण्यासाठी किंवा झोप येण्यासाठी अनेक व्यक्ति ओपिऑईड या औषधाचा उपयोग करतात, परंतु सदर औषध मानसिक आरोग्यासाठी उपयुक्त नसल्याचे माहे जानेवारी, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन आवश्यक कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (०७-०९-२०१९) :** (१) हे खरे नाही.

माहे जानेवारी, २०१६ मध्ये मानसिक आरोग्यासाठी उपयुक्त नसलेल्या, ओपिऑईड या औषधाचा मानसिक वेदना घालविण्यासाठी किंवा झोप येण्यासाठी अनेक व्यक्ती उपयोग करीत असल्याचे दिसून आले नाही.

(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मालवण (जि.सिंधुदुर्ग) येथील ग्रामीण रुग्णालयातील रिक्त पदे भरण्याबाबत

**(११) १८४७५ (०२-०५-२०१६). अ‍ॅड.हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मालवण (जि.सिंधुदुर्ग) येथील ग्रामीण रुग्णालयात वैद्यकीय अधिकारी, कर्मचारी, टेक्निशियन, इ. पदे रिक्त असल्याचे माहे जानेवारी, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर रिक्त पदे भरण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (२६-०८-२०१९) :** (१) हे अंशत: खरे आहे.

ग्रामीण रुग्णालय मालवण जि.सिंधुदुर्ग येथे गट-अ ते गट-ड संवर्गाची एकूण २६ पदे मंजूर असून १६ पदे भरलेली व १० पदे रिक्त आहेत.

(२) व (३) वैद्यकीय अधिकारी गट-अ (ग्रेड पे ६६००/-) संवर्गातील रिक्त पदे भरण्याची कार्यवाही शासनस्तरावर सुरु आहे. तसेच दि.२७/१२/२०१८ रोजी वैद्यकीय अधिकारी गट-अ (ग्रेड पे रुपये ५४००/-) संवर्गातील रिक्त पदे नियमितरित्या भरण्यासाठी जाहिरात प्रसिध्द करण्यात आली असून पुढील कार्यवाही सुरु आहे. तसेच राज्यातील वैद्यकीय अधिकारी गट-अ संवर्गाची रिक्त पदे कंत्राटी तत्वावर भरण्याचा शासनाने निर्णय घेतला असून जिल्हा स्तरावरील गठीत समितीमार्फत सदर पदे भरण्याची कार्यवाही सुरु आहे. गट-क व गट-ड संवर्गातील रिक्त पदे भरण्याची कार्यवाही क्षेत्रियस्तरावर करण्यात येत आहे.

---

## यवतमाळ जिल्हयातील शेतकरी व मजुरांसाठी राबविण्याचा कृतज्ञता निधीबाबत

**(१२) १९००२ (२०-०४-२०१७). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर :** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) यवतमाळ जिल्हयातील शेतकरी व मजुरांसाठी राबविण्याचा कृतज्ञता निधीबाबतचा प्रस्ताव गत सहा महिन्यांपासून प्रलंबित आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, यवतमाळ जिल्हयातील शेतकरी व शेतमजुर यांच्यासाठी राबविण्याच्या कृतज्ञता निधीच्या प्रस्तावास मंजूरी देण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (२०-०९-२०१९) :** (१) व (२) मा.मुख्यमंत्री सहायता निधीच्या धर्तीवर कृतज्ञता निधी स्थापन करुन प्रस्तावाची जिल्हास्तरावर कार्यवाही करणेबाबतचा प्रस्ताव जिल्हाधिकारी, यवतमाळ यांच्याकडून दिनांक २७ ऑगस्ट, २०१५ रोजी सादर करण्यात आला. परंतु त्याआधीच शेतकऱ्यांच्या आत्महत्या रोखण्यासाठी पथदर्शी प्रकल्प (बळीराजा चेतना अभियान) म्हणून विशेष मदतीचा कार्यक्रम राबविणेबाबत शासन निर्णय दिनांक २४ जुलै, २०१५ रोजी निर्णय घेण्यात आला असून पथदर्शी प्रकल्पांतर्गत शेतकऱ्यांच्या आत्महत्या होणाऱ्या जिल्हयांकरीता विविध उपाययोजना करण्याच्या अनुषंगाने यवतमाळ व उस्मानाबाद या दोन जिल्हयांची निवड करण्यात आली आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## ठाणे जिल्हा सामान्य रुग्णालयात नवीन शवागार व शव विच्छेदन केंद्र बांधण्याबाबत

**(१३) १९७८९ (११-०८-२०१६). अॅड.निरंजन डावखरे : तारांकित प्रश्न क्रमांक १४९९१ ला दिनांक १८ मार्च, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) ठाणे जिल्हा सामान्य रुग्णालयातील शवागारात केवळ १२ मृतदेहच ठेवण्याची क्षमता असल्याचे माहे मार्च, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, रुग्णालयातील शवागारातील जागा अपुरी असल्याने शवागारात एकावर एक मृतदेह ठेवण्याची पाळी रुग्णालय प्रशासनावर येत असल्याने सिव्हील रुग्णालयात सुसज्ज नवीन शवागार व शवविच्छेदन केंद्र (Postmortem Center) उभारण्यात यावे, अशी मागणी स्थानिकांकडून उपसंचालक, आरोग्य सेवा, ठाणे, मा.ठाणे जिल्हा पालकमंत्री यांचेकडे करण्यात येत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, त्यानुसार नवीन शवागार व शवविच्छेदन केंद्र बांधण्याबाबतचा

प्रस्ताव जिल्हा शल्यचिकित्सक, ठाणे यांचेकडून दिनांक ९ मार्च, २०१५ रोजी शासनाकडे पाठविला असून, सदर प्रस्तावाची छाननी सुरु असल्याचे दिनांक १० डिसेंबर, २०१५ रोजीच्या तारांकित प्रश्नाच्या उत्तरामध्ये नमूद केले आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, ठाणे जिल्हा सामान्य रुग्णालयात शवविच्छेदन केंद्र व दुसरे नवीन शवागार उभारण्यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (२०-०८-२०१९) :** (१) व (२) हे अंशत: खरे आहे.

रुग्णालयातील शवागृहात जरी जागा अपुरी असली तरी शवागृहात एकावर एक मृतदेह ठेवण्यात येत नाहीत. तसेच नवीन शवविच्छेदन गृह तयार करण्यासाठी मा.पालकमंत्री, ठाणे यांनी भेटी दरम्यान निर्देश दिलेले होते.

(३) हे खरे आहे.

(४) जिल्हा सामान्य रुग्णालय, ठाणे येथे शवविच्छेदन केंद्र उपलब्ध असून तेथे नियमितपणे शवविच्छेदन सेवा पुरविली जाते. तसेच शासन निर्णय दि.१७/०७/२०१८ अन्वये ठाणे जिल्हा रुग्णालय येथे ५७४ खाटांचे जिल्हा रुग्णालय व संदर्भ सेवा रुग्णालय (सुपर स्पेशालिटी रुग्णालय) सुरु करण्यास मान्यता देण्यात आली असून, यामध्ये शवागार उभारण्याचा समावेश करण्यात आला आहे.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## जिल्हा परिषद यवतमाळ येथील हिवताव विभागातील रिक्त पदे भरण्याबाबत

**(१४) २३७९२ (२१-१२-२०११). श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) यवतमाळ जिल्हा परिषदेकडे आरोग्य विभागाकडून हिवताप विभाग हस्तांतरीत झाला असतानाही या विभागाने त्यांच्याकडील अनेक रिक्त पदे

भरली नाहीत तसेच जिल्हा परिषदेलाही रिक्त पदाची माहिती दिलेली नसल्यामुळे हजारो पदे रिक्त आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यातील सर्व जिल्ह्यांमध्ये ही परिस्थिती आहे, यामुळे रिक्त पदांच्या अनुशेष सातत्याने वाढत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, या रिक्त असलेल्या पदांमुळे ग्रामीण भागातील आरोग्य यंत्रणेवर ताण वाढतो आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने रिक्त पदे भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (१७-०७-२०१९) :** (१) हे अंशत: खरे आहे काय.

(२) हे अंशत: खरे आहे.

(३) हे अंशत: खरे आहे.

(४) सन २०१६ मध्ये भरती प्रक्रिया राबविण्यात आली असून रिक्त पदे भरण्याची कार्यवाही करण्यात आली. आता १०० टक्के पदभरतीस मान्यता मिळाल्याने महापदभरतीप्रक्रिये अंतर्गत जिल्हा आरोग्य सेवेची ग्रामविकास विभागाकडून व राज्यस्तरीय पदे सार्वजनिक आरोग्य विभागाकडून भरण्याची प्रक्रिया सुरु झाली आहे, गट अ व ब ची वैद्यकिय अधिकाऱ्यांची पदे शासनस्तरावरुन भरण्याची प्रक्रिया सुरु झाली आहे.

(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात विशेषत: यवतमाळ जिल्ह्यातील ऑनलाईन शपथपत्र बंद करण्याबाबत

**(१५) २४७०९ (३०-१२-२०१६). श्री.हरिसिंग राठोड, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात विशेषत: यवतमाळ जिल्ह्यात नियमानुसार कोणतेही शपथपत्र हे न्याय दंडाधिकारी यांच्या समक्ष तयार होणे गरजेचे असताना सध्या ते

ऑनलाईन पध्दतीने तयार करण्यात येत असून असे शपथपत्र तयार झाल्यानंतर त्यावर केवळ कार्यकारी दंडाधिकारीची डिजिटल स्वाक्षरी असे परंतु शपथकर्ता किंवा साक्षीदार यांची त्यावर स्वाक्षरी होत नाही, त्यामुळे या शपथपत्राचा मोठ्या प्रमाणात गैरप्रकार होत असल्याचे माहे सप्टेंबर, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार शपथपत्रांचा गैरप्रकार होऊ नयेत यासाठी ऑनलाईन शपथपत्र बंद करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२९-०८-२०१९) :** (१) यवतमाळ जिल्ह्यात शपथपत्र हे ऑनलाईन पध्दतीने 'आपले सरकार' सेवा केंद्रामार्फत दाखल केले जाते. अर्जदाराचे फोटो, अर्जदाराचे ओळखपत्र व त्यांनी केलेले शपथपत्र हे सर्व तपासून डिजिटल स्वाक्षरी केली जाते. सदर शपथपत्र दाखल करताना अर्जदार प्रत्यक्ष 'आपले सरकार' सेवा केंद्रावर उपस्थित असतात. याबाबत गैरप्रकार झाल्याचे आढळून आले नाही.

(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## भुशी धरण-लोणावळा, खडकवासला-पुणे, सोनलपाडा-कर्जत या धरणांच्या सुरक्षिततेबाबत

**(१६) २४७५० (०४-०१-२०१७). आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) भुशी धरण-लोणावळा तसेच सोनलपाडा-कर्जत इ.धरणक्षेत्रात मद्यपी पर्यटकांमुळे धरणाच्या पाण्यात येथे दिनांक १७ जुलै, २०१६ रोजी दारुच्या बाटल्या मोठ्या प्रमाणात टाकल्या जात असून यामध्ये दोन माणसे बेपत्ता होऊन त्यांचे मृतदेह दिनांक १८/१९ जुलै, २०१६ रोजी वा त्यासुमारास मिळाले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, भुशी धरण-लोणावळा, खडकवासला-पुणे, सोनलपाडा-कर्जत इ.धरणक्षेत्रात मद्यपी पर्यटकांमुळे धरणाच्या पाण्यात दारुच्या बाटल्या मोठ्या प्रमाणात टाकल्या जात असल्याने केवळ आरोग्याला नव्हेतर धरणाच्या सुरक्षिततेला धोका निर्माण झाला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, या प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर ठिकाणी येणाऱ्या मद्यपी पर्यटकांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (०५-०८-२०१९) :** (१) अंशत: खरे आहे.

मृद व जलसंधारण विभागाकडील सोनलपाडा-कर्जत या धरणाच्या क्षेत्रात सन २०१६ मध्ये दोन पर्यटकांचे मृत्यू झालेले आहेत.

भुशी धरण-लोणावळा हे धरण मध्य रेल्वेच्या अखत्यारीतील धरण आहे.

(२) व (३)

१) भुशी धरण-लोणावळा हे मध्य रेल्वेच्या अखत्यारीत आहे.

२) खडकवासला-पुणे या जलसंपदा विभागाकडील धरणांच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने धरणांवर नागरिकांना प्रतिबंध करणे, धरणांची निगा राखणे इ. कामांसाठी जलसंपदा विभागामार्फत कर्मचाऱ्यांची नियुक्ती करण्यात आली आहे. तसेच खडकवासला धरण स्थळी पोलीस आयुक्त, पुणे यांची सुरक्षा यंत्रणा कार्यरत आहे.

३) सोनलपाडा-कर्जत या मृद व जलसंधारण विभागाकडील धरणक्षेत्रात तालुका आपत्ती निवारण प्रमुख तथा तहसिलदार कर्जत, जिल्हा रायगड यांना कलम १४४(१) अन्वये दिनांक २०/०७/२०१६ रोजी जमावबंदी आदेश जारी करून पर्यटकांना धरण परिसरात जाण्यास बंदी करणेत आली आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील दिव्यांगांना प्रमाणपत्र वेळेत मिळण्याबाबत

**(१७) २६९७८ (१५-०४-२०१७). प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नागपूर शहरात मेडीकल व मेयो रुग्णालयातील 'सर्व्हर' संथ असल्याने दिव्यांग व्यक्तींचे प्रमाणपत्र प्रमाणपत्राचे नुतनीकरण वेळेत मिळत नसून पुढील तीन ते चार महिन्याची तारीख दिल्याने त्यांना सतत रुग्णालयाच्या फेऱ्या माराव्या लागत असल्याचे दिनांक २२ जानेवारी, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सध्या २७० दिव्यांग व्यक्ती ३ महिन्यांपासून प्रमाणपत्राच्या प्रतिक्षेत असल्याचे दिनांक ३ डिसेंबर, २०१६ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, विदर्भातील जिल्हा सामान्य रूग्णालयांतील दिव्यांना देण्यात येणारे 'सर्व्हर' ची गती वाढविण्याकरीता तसेच नुतनीकरणाकरीता आवश्यक विविध तपासणी एक दिवसात करण्यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (१०-०७-२०१९) :** (१) हे अंशत: खरे आहे.

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर या संस्थेमध्ये नागपूर शहरातील दिव्यांगाना अपंगत्वाचे प्रमाणपत्र वितरीत केले जाते. सदर संस्थेतील सर्व्हरची प्रमाणपत्र वितरीत केले जाते. सदर संस्थेतील सर्व्हरची गती संथ असल्यामुळे व काही तांत्रिक अडचणींमुळे दिव्यांगांना प्रमाणपत्राकरीता ३ ते ४ महिन्यांची तारीख दिली जात होती. त्यांचा त्रास कमी करण्यासाठी प्रमाणपत्र तयार झाल्यावर त्यांना मोबाईलवर कळविण्यात येते.

तथापि, इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर या संस्थेमार्फत नागपूर ग्रामीण भागातील दिव्यांगांना अपंगत्वाचे प्रमाणपत्र वितरीत केले जात असून, सदर संस्थेमध्ये सद्य:स्थितीत कोणतीही प्रतिक्षा यादी नाही.

(२) शासकीय, वैद्यकीय महाविद्यालय, नागपूर यांच्याकडे दिनांक ०३ डिसेंबर, २०१६ रोजी प्रतिक्षेत असलेल्या ८०० दिव्यांग व्यक्तींना प्रमाणपत्र

वितरीत करण्यात आलेली असून आजमितीस दिव्यांग व्यक्तींची प्रमाणपत्रे प्रलंबित नाहीत.
(३) सदर संस्थांमध्ये दिव्यांगांना देण्यात येणाऱ्या प्रमाणपत्राकरीताच्या सर्व्हरची (SADM) गती वाढविण्याबाबत सार्वजनिक आरोग्य विभाग व सामाजिक न्याय विभागाकडे पाठपुरावा करण्याच्या सूचना संचालकांना देण्यात येत आहेत.
(४) लागू नाही.

---

## परभणी जिल्हा सामान्य रुग्णालयाची मेट्रो रक्तपेढीची इमारत जिल्हा सामान्य रुग्णालयाकडे हस्तांतरीत करण्याबाबत

**(१८) २८०५३ (१५-०४-२०१७). प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) परभणी येथील जिल्हा सामान्य रुग्णालयाची रक्तपेढीच्या इमारतीचे काम गेल्या ३ वर्षापासून पूर्ण झाले असूनही जिल्हा सामान्य रुग्णालयाकडे सदर इमारत हस्तांतरीत करण्यात आली नसल्याचे माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, इमारतीचे हस्तांतरण प्रलंबित राहिल्यामुळे रक्त संकलन करण्यासाठी कर्मचाऱ्यांना अनेक अडचणींचा सामना करावा लागत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२२-०६-२०१७) :** (१) हे खरे नाही.
(२), (३) व (४) मेट्रो रक्तपेढीचे काम पूर्ण करुन दिनांक ३१/३/२०१५ रोजी उपभोक्ता विभागास हस्तांतरीत करण्यात आली असून सद्य:स्थितीत रक्तपेढी नवीन इमारतीमध्ये कार्यरत आहे.

---

## राज्यातील ग्रामीण व शहरी भागातील रुग्णालयात परिचारिकांची रिक्त पदे भरण्याबाबत

**(१९) २९००४ (१५-०४-२०१७). श्रीमती स्मिता वाघ, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.सुजितसिंह ठाकूर :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील ग्रामीण व शहरी भागातील रुग्णालयात मिळून सध्या ३० हजार परिचारिका कार्यरत असून दोन हजारांहून अधिक पदे रिक्त असल्याने या परिचारकांवर अतिरिक्त कामाचा ताण पडत असून त्यांना दोन पाळीत १२ तासांपेक्षा अधिक काळ रुग्णसेवा करावी लागत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यात प्रशिक्षित परिचारिकांचा तुटवडा असल्याने मा.सार्वजनिक आरोग्य मंत्री यांनी परिचारीका व परिसेवकांची आणखी काही पदे मंजूर केलेली असून, जी पदे अनेक वर्षापासून रिक्त आहेत ती अद्याप भरलेली नसल्याचे दिनांक ३ जानेवारी, २०१६ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, खाजगी नर्सिंग महाविद्यालयातून प्रशिक्षण घेतलेल्या परिचारीकांना सीईटीची अट न ठेवता सरळ सेवाभरती करण्याबाबत शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (२६-०८-२०१९) :** (१) हे अंशत: खरे आहे.

सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत परिचारिकांच्या सर्व संवर्गामध्ये मिळून एकूण २४८१३ पदे मंजूर आहेत. त्यापैकी २१९३८ पदे भरलेली असून २८७५ पदे रिक्त आहेत. तसेच वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागांतर्गत एकूण १११८१ पदे मंजूर असून त्यापैकी ९८४० पदे भरलेली आहेत तर १३४१ पदे रिक्त आहेत. आरोग्य संचालनालयांतर्गत असलेल्या पदांवर राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत तसेच बंधपत्रीत परिचारिकांना कंत्राटी पध्दतीने नियुक्ती देऊन रुग्णसेवा सुरळीतपणे देण्यात येत आहे.

(२) हे खरे नाही.

सदरची पदे सरळसेवेने भरण्याबाबतची जानेवारी, २०१६ मध्ये भरती प्रक्रिया राबविण्यात आलेली असून जून, २०१८ पर्यंत पदस्थापना देण्यात आलेली आहे.
(३) प्रचलित सेवा प्रवेश नियमानुसारच पदभरती करण्यात आली आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मौजे लोनाड (ता.भिवंडी, जि.ठाणे) येथील ग्रामस्थांच्या वहिवाटाचा बंद केलेला रस्ता खुला करण्याबाबत

**(२०) ३६९८३ (०३-०१-२०१८). श्री.आनंद ठाकूर : दिनांक २ ऑगस्ट, २०१७ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक ६ मधील प्रश्न क्रमांक २९५१० ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात:** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मौजे लोनाड (ता.भिवंडी, जि.ठाणे) येथील सर्व्हे क्र.११, हिस्सा क्र. १, ३ व ५ या जागेत ग्रामस्थांच्या वहिवाटीतील वडिलोपार्जित जागेत कमलेश सदाभाई पटेल यांनी मोठी गोदामे बांधून रस्ता बंद केल्यामुळे स्थानिक ग्रामस्थांनी व लोकप्रतिनिधींनी तहसिलदार, भिवंडी, उपविभागीय अधिकारी, भिवंडी, पोलीस निरीक्षक, भिवंडी यांना दिनांक ८ ऑक्टोबर, २०१२, २३ जुलै, २०१३, माहे जुलै, २०१४ व माहे जानेवारी, २०१५ व माहे डिसेंबर, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान लेखी निवेदनाद्वारे तक्रारी केलेल्या आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदरच्या रस्त्याचे प्रकरण तहसिलदार, भिवंडी यांचेकडे प्रलंबित असल्याचे कळवून अद्यापपावेतो सदरहू रस्ता खुला केलेला नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून सदर वहिवाटाचा रस्ता खुला करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२९-०८-२०१९) :** (१), (२), (३) व (४) मौजे लोनाड, ता.भिवंडी, जि.ठाणे येथील स.नं. ११/१ व इतर या जागेत बांधकाम करुन

रस्ता बंद केल्याबाबतच्या तक्रारीची काही निवेदने प्राप्त झालेली आहेत.

मौजे लोनाड (ता.भिवंडी, जि.ठाणे) येथील सर्व्हे क्र.११, हिस्सा क्र. १, ३ व ५ या मिळकतीमधून असलेला वहिवाटीचा रस्ता पूर्ववत करावा यासाठी श्री.रघुनाथ कानू पाटील व इतर यांनी तहसिलदार, भिवंडी यांच्या न्यायालयात मामलेदार न्यायालय अधिनियम, १९०६ चे कलम ५ अन्वये दावा दाखल केला होता.सदर दावा तहसिलदार, भिवंडी यांनी दिनांक ०२/०७/२०१३ च्या आदेशान्वये फेटाळला आहे.

---

## संशोधन (पीएचडी) करणाऱ्या विद्यार्थ्यांना सर्व विषयाकरीता गाईड उपलब्ध करुन देण्याबाबत

**(२१) ३८०८२ (०५-०४-२०१८). प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) महाराष्ट्रात विशेषत: विदर्भातील राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठासह गोंडवाना गडचिरोली विद्यापीठामध्ये संशोधन करणाऱ्या (पीएचडी) विद्यार्थ्यांच्या प्रवेश नोंदणी परीक्षेमध्ये (पीईटी) अर्ज दाखल करणाऱ्या विद्यार्थांची संख्या कमी झाल्याचे दिनांक २९ डिसेंबर, २०१७ रोजी वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, फक्त राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठात वर्ष २०१७ ची विद्यार्थी संख्या वर्ष २०१६ पेक्षा कमी आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, विदर्भातील बहुतांश विद्यापीठात अनेक विषयाकरीता गाईडची उपलब्धता नसल्यामुळे ही नोंदणी कमी झालेली आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सर्व विषयाकरीता गाईडची उपलब्धता करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१२-०६-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) होय, हे खरे आहे. सप्टेंबर, २०१६ मध्ये झालेल्या पेट परिक्षेत एकूण

४३०२ व जानेवारी, २०१८ मध्ये झालेल्या पेट परिक्षेत एकूण ३३०२ विद्यार्थ्यांचे अर्ज प्राप्त झाले होते.
(३) हे खरे नाही. राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठामध्ये काही अपवादात्मक विषय वगळता पुरेशा प्रमाणात मार्गदर्शक उपलब्ध आहेत. विद्यापीठ अनुदान आयोगाने निर्धारित केलेल्या निकषानुसार संशोधन केंद्र म्हणुन ज्या महाविद्यालयांना मान्यता देण्यात आली आहे, त्या महाविद्यालयातील संबंधित विषयाच्या पूर्णकाळ शिक्षकांनाच मार्गदर्शक म्हणुन मान्यता देण्यात येते. इतर महाविद्यालयातील शिक्षकांना मार्गदर्शक म्हणुन मान्यता देता येत नसल्याने काही विषयासाठी मार्गदर्शक उपलब्ध होत नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नागपूर विद्यापीठाच्या पुरातत्व विभागातुन पुरातन नाणी गहाळ झाल्याबाबत

**(२२) ३८२५५ (०५-०४-२०१८). प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.गिरीशचंद्र व्यास : तारांकित प्रश्न क्रमांक २७०४० ला दिनांक २० मार्च, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात:** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठाच्या पुरातत्व विभागातुन पुरातन मौल्यवान नाणी व इतर वस्तू गहाळ झाल्या, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी विभागीय आयुक्त यांनी समिती गठीत केली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (१६-०७-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) होय, हे खरे आहे.
(३) सदर प्रकरणी विद्यापीठामार्फत दिनांक १९ मे, २०१६ रोजी अंबाझरी पोलीस स्टेशन, नागपूर येथे लेखी तक्रार नोंदविण्यात आली आहे. सदर प्रकरणाची पोलीस चौकशी सुरु आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील सर्व पुलांचे स्ट्रक्चरल ऑडीट करुन दुरूस्ती करण्याबाबत

**(२३) ३९५०० (०५-०४-२०१८). श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण : तारांकित प्रश्न क्रमांक ३४८४८ ला दिनांक १२ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात:** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) महाड (जि.रायगड) येथील सावित्री नदीवरील पूल माहे ऑगस्ट, २०१६ मध्ये पावसाळ्यात वाहून गेल्यानंतर शासनाने राज्यातील २९०० जुन्या पुलांचे "स्ट्रक्चरल ऑडीट" पूर्ण केले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, याकरीता १ हजार १२३ पुलांच्या दुरुस्तीसाठी सार्वजनिक बांधकाम विभागाने वर्षाचा कालबध्द कार्यक्रम तयार केला आहे काय, त्यांचे स्वरुप काय आहे, या पुलांच्या दुरुस्तीकरीता किती खर्च येणार आहे व पुलांच्या दुरुस्तीकरीता निधी कशाप्रकारे उभारण्यात येणार आहे,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत?

**श्री.चंद्रकांत पाटील (१३-०५-२०१९) :** (१), (२) व (३) होय, हे अंशत: होय खरे आहे.

राज्यातील सार्वजनिक बांधकाम विभागाच्या रस्त्यावर २५०८७ पूल असून त्यांची नियतकालीन तपासणी करण्यात आली आहे. तपासणीमध्ये ज्या पुलांमध्ये संरचनात्मक दोष आढळून आले आहेत. पुलांच्या दुरूस्तीसाठी सुमारे रुपये ६३१.७० कोटी खर्च अपेक्षीत आहे. उपलब्ध निधी, निकष निहाय तसेच प्राधान्यक्रम यानुसार दुरूस्तीची कार्यवाही योजनेतर रस्ते व पूल देखभाल दूरुस्ती अनुदानातून हाती घेण्यात आली आहे.

एकूण २९३ पूलांसाठी पूर पातळी धोक्याच्या पातळीवर गेल्यास नियंत्रण कक्षामध्ये सूचना मिळण्यासाठी पूर पातळी निदर्शक इलेक्ट्रॉनिक सेन्सर बसविण्यात आले आहेत.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## जिल्हा परिषद शिक्षकांचे राज्यस्तरीय रोष्टर एकत्रित करण्याबाबत

**(२४) ४२१४८ (०२-०८-२०१८). श्री.बाळाराम पाटील, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील जिल्हा परिषद प्राथमिक शिक्षकांचे जिल्हा अंतर्गत बदलीबाबत अनेक प्रस्ताव राज्यस्तरीय रोष्टर एकत्रित न केल्यामुळे प्रलंबित आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, रोष्टर एकत्रित करण्याबाबत जिल्हा परिषद शिक्षकांच्या विविध संघटना व लोकप्रतिनिधींनी मागणी केली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने जिल्हा परिषद प्राथमिक शिक्षकांचे राज्यस्तरीय रोष्टर एकत्रित करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०९-०७-२०१९) :** (१), (२) व (३) राज्यातील जिल्हा परिषद शिक्षकांच्या जिल्हांतर्गत बदल्यांमध्ये रोष्टर चा मुद्दा आवश्यक आहे. ज्या जिल्हा परिषदांचे रोस्टर मागासवर्ग कक्ष, विभागीय आयुक्त कार्यालय यांचेकडून तपासून झाले आहे अशाच जिल्हा परिषदांमध्ये अन्य जिल्हा परिषदांतील शिक्षकांना त्यांच्या निवडीच्या प्रवर्गाच्या रिक्त पदावर बदलीने नियुक्ती दिली जाते. राज्यस्तरीय रोस्टरमुळे बदलीचे प्रस्ताव प्रलंबित राहिलेले नाहीत.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

## यवतमाळ जिल्ह्यातील सेस फंडाचे अनुदान शेतकऱ्यांच्या खात्यात जमा करण्याबाबत

**(२५) ४२९१४ (०२-०८-२०१८). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) यवतमाळ जिल्हा परिषदेमार्फत सेस फंडातून शेतकऱ्यांसाठी राबविलेल्या विविध शेतीपूरक योजनांचे अनुदान संबंधित शेतकऱ्यांच्या खात्यात जमा न झाल्याने लोणबेहळ परिसरातील शेतकऱ्यांमध्ये असंतोष निर्माण झाला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त योजनांचे अनुदान शेतकऱ्यांच्या खात्यात जमा करण्याबाबतची सद्य:स्थिती काय आहे,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत, ?

**श्रीमती पंकजा मुंडे (२०-०६-२०१९) :** (१) हे खरे नाही.

(२), (३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

## मौजे खंडाळी (ता.अहमदपूर, जि.लातूर) येथील जिल्हा परिषद शाळा इमारतीस लागलेल्या आगीबाबत

**(२६) ४३०२४ (०२-०८-२०१८). श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे खंडाळी (ता.अहमदपूर, जि.लातूर) येथील जिल्हा परिषद शाळा इमारतीस दिनांक ७ मे, २०१८ रोजी वा त्यासुमारास आग लागली, हे खरे

आहे काय,

(२) असल्यास, आगीमध्ये झालेल्या नुकसानीचे स्वरुप काय आहे,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०२-०८-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) जिल्हा परिषद शाळेत लागलेल्या आगीमध्ये नादुरुस्त टेबल-खुर्च्या व भंगार साहित्य जळाले आहे.

(३) पोलीस ठाणे, किनगांव येथे घटनेबाबत माहिती कळविली आहे. सदर घटनेत जिवित हानी झालेली नसून सदर खोली वापरण्यास अयोग्य झाली आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## ग्रुप ग्रामपंचायत भोगाव खुर्द, भोगाव बुदुक (ता.पोलादपूर, जि.रायगड) या गावात जिल्हा नियोजन निधीतून शाळा संरक्षण भिंत बांधण्याबाबत

**(२७) ४३३३० (०२-०८-२०१८). श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) ग्रुप ग्रामपंचायत भोगाव खुर्द, भोगाव बुदुक (ता.पोलादपूर, जि.रायगड) या गावात जिल्हा नियोजन निधीतून शाळा संरक्षण भिंत बांधण्याचे काम मंजूर करणेबाबत मा.पालकमंत्री, रायगड जिल्हा यांना दिनांक १५ मे, २०१८ रोजी वा त्यासुमारास लेखी निवेदन दिले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या निवेदनावर शासनाने निर्णय घेतला असल्यास त्याचे स्वरुप काय आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०२-०८-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) जिल्हा परिषद सेस फंड किंवा जिल्हा परिषदेच्या इतर योजनांतर्गत सन २०१८-१९ मध्ये निधी उपलब्ध नसल्याने जिल्हा नियोजन समितीकडे मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता.तथापि, जिल्हा वार्षिक योजनांतर्गत जिल्हा परिषद शाळांना संरक्षक भिंत बांधकाम करणे या योजनाचा समावेश नसल्याने जिल्हा नियोजन समितीने सदर प्रस्ताव परत पाठविला आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मौजे गोगोतांडा (ता.देगलूर, जि.नांदेड) येथील जिल्हा परिषद प्राथमिक शाळा उघड्यावर भरत असल्याबाबत

**(२८) ४४९८० (०५-१२-२०१८). श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मौजे गोगोतांडा (ता.देगलूर, जि.नांदेड) येथील जिल्हा परिषद प्राथमिक शाळेचे वर्ग इमारतीअभावी उघड्यावर भरत असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०१-०८-२०१९) :** (१) नाही, हे खरे नाही. तथापि, सदरहु शाळाचे वर्ग निवासी जागेत भरविण्यात येत आहेत.
(२) होय, मौजे गोगोतांडा (ता.देगलूर, जि.नांदेड) येथे जिल्हा परिषद शाळेची इमारत बांधण्यासाठी जागा उपलब्ध नसल्याने शाळांच्या वर्ग खोल्या मंजूर करता आलेल्या नाहीत.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबईतील दहिसर येथील तत्कालिन सहाय्यक पोलीस निरीक्षकावर कारवाई करण्याबाबत

**(२९) ४६४८८ (१५-०३-२०१९). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील दहिसर येथील तत्कालिन सहाय्यक पोलीस निरीक्षक यांना सन २०१३ मध्ये लाच स्वीकारतांना रंगेहाथ पकडून दिल्याचा मनात राग धरुन कांदिवली (पूर्व) येथील एका सामाजिक कार्यकर्त्यास सदर सहाय्यक पोलीस निरीक्षक व त्याचे वरिष्ठ वारंवार मारहाण व खोटया गुन्हयांमध्ये अडकवून त्यांच्यावर दबाव आणण्याचा प्रयत्न करीत असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी मा.विरोधी पक्ष नेता, विधान परिषद यांनी सखोल चौकशी करुन दोषी आढळून येणाऱ्यांवर कठोर कारवाई करण्याबाबत मा.मुख्यमंत्री यांना दिनांक ४ जानेवारी, २०१९ रोजी वा त्यासुमारास लेखी पत्र दिले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त पत्राची दखल घेऊन संबंधित दोषींवर शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१८-०७-२०१९) :** (१) हे खरे नाही.

(२) हे खरे आहे.

(३) सदर प्रकरणी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी केलेल्या एकंदरीत चौकशीमध्ये अर्जदार हे जुन्या तक्रारीच्या आधारे पुन्हा पुन्हा वरिष्ठांना अर्ज सादर करून पोलीस यंत्रणेचा गैरवापर करीत असल्याचे आढळून आले आहे. त्यांच्या सदर तक्रारी अर्जावर यापुर्वीच चौकशी झालेली असून सदरचा अर्ज हा चौकशीअंती दप्तरी दाखल करण्यात आलेला आहे.

(४) विलंब झालेला नाही.

---

## नगरपालिका व महानगरपालिका क्षेत्रातील सर्व शासकीय जमिनीवरील अतिक्रमणे नियमानुकूल करण्याचा निर्णय घेतल्याबाबत

**(३०) ४६६७७ (१२-०७-२०१९). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद**

**ठाकूर, श्री.किरण पावसकर, श्री.प्रकाश गजभिये, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) शासनाने नगरपालिका व महानगरपालिका क्षेत्रातील सर्व शासकीय जमिनीवरील अतिक्रमणे नियमानुकूल करण्याचा निर्णय दिनांक ०६ मार्च, २०१९ रोजी वा त्यासुमारास घेतला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त निर्णयातून वन विभागाच्या तसेच सीआरझेड क्षेत्राच्या जमिनीवरील अतिक्रमणाला वगळण्यात आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर योजनेचे थोडक्यात स्वरुप काय आहे व आतापर्यंत किती अतिक्रमणे नियमानुकूल करण्यात आली वा येत आहेत,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१९-०९-२०१९) :** (१) "सर्वांसाठी घरे-२०२२" या केंद्र शासनाच्या धोरणांतर्गत, "प्रधानमंत्री आवास योजनेची" प्रभावी अंमलबजावणी होण्याच्या दृष्टीने नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या क्षेत्रातील महसूल विभागाच्या अखत्यारित असलेल्या शासकीय जमिनीवरील निवासी प्रयोजनासाठी अतिक्रमण केलेल्या आणि प्रधानमंत्री आवास योजनेसाठी पात्र असणाऱ्या अतिक्रमण धारकास या योजनेचा लाभ मिळावा यासाठी दिनांक १७/११/२०१८ च्या शासन निर्णयान्वये मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत.

तद्नंतर, याच अनुषंगाने, नागरी भागातील शासनाच्या इतर (वन विभाग वगळून) विभागांच्या जमिनीवरील अशा अतिक्रमीत पात्रताधारकास या योजनेचा लाभ मिळावा यासाठी दिनांक ०६/०३/२०१९ च्या शासन निर्णयान्वये मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत.
(२) राज्यातील सर्व क्षेत्रावर भारतीय वन संवर्धन अधिनियम, १९८० च्या तरतुदी लागू असून, अशा क्षेत्राचा वनेत्तर प्रयोजनासाठी वापर करावयाचा झाल्यास त्यास केंद्र शासनाची पूर्व मंजूरी घेणे आवश्यक आहे. त्यामुळे वन विभागाच्या तसेच डोंगर उताराच्या आणि सीआरझेड मधील जमिनी उपरोक्त शासन निर्णयातून वगळण्यात आलेल्या आहेत.
(३) व (४) "सर्वांसाठी घरे-२०२२" या केंद्र शासनाच्या धोरणांतर्गत, "प्रधानमंत्री

आवास योजनेची" प्रभावी अंमलबजावणी करण्याच्या अनुषंगाने उपरोक्त शासन निर्णयान्वये "मार्गदर्शक सूचना" निर्गमित केलेल्या आहेत.

शासन निर्णयातील "मार्गदर्शक सूचनानुसार" पुढील कार्यवाही सुरु आहे.

---

## राज्यातील आयटीआयमध्ये शिकणाऱ्या विद्यार्थ्यांच्या विद्यावेतनात वाढ करण्याबाबत

**(३१) ४६६८४ (०६-०७-२०१९). श्री.विक्रम काळे, डॉ.सुधीर तांबे, श्री.सतिश चव्हाण, श्री.बाळाराम पाटील, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे :** सन्माननीय **कौशल्य विकास व उद्योजकता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील आयटीआयमध्ये शिकणाऱ्या विद्यार्थ्यांना गत अनेक वर्षापासून केवळ चाळीस रुपये विद्यावेतन देण्यात येत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सध्याच्या महागाईच्या काळात सदर विद्यावेतन अतिअल्प असल्याने विद्यार्थ्यांकडून विद्यावेतनात वाढ करण्याची सातत्याने मागणी होत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर मागणीच्या अनुषंगाने शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.संभाजी पाटील-निलंगेकर (२६-०८-२०१९) :** (१) औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधील एकूण प्रशिक्षणार्थ्यांपैकी आर्थिकदृष्ट्या मागास असलेल्या प्रशिक्षणार्थ्यांना दरमहा रुपये ४०/- तसेच मागासवर्गीय प्रशिक्षणार्थ्यांना दरमहा रुपये ६०/- याप्रमाणे विद्यावेतन देण्यात येते.

(२) हे खरे आहे.

(३) व (४) औद्योगिक प्रशिक्षण संस्थामध्ये शिकणाऱ्या विद्यार्थ्यांच्या विद्यावेतनात रुपये ५००/- इतकी वाढ करण्याच्या प्रस्तावावर कार्यवाही सुरू आहे.

---

## राज्यात विशेषत: हिंगोली जिल्ह्यात वाळू घाट लिलावास सुरुवात करण्याबाबत

**(३२) ४७०९८ (०५-०७-२०१९). श्री.विक्रम काळे, श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात विशेषत: हिंगोली जिल्ह्यात वाळू उपस्यावर निर्बंध नसल्यामुळे अवैध वाळू उपसा करण्याचे प्रकार वाढीस लागले आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यात वाळू घाट लिलावास वारंवार न्यायालयात होणाऱ्या याचिकांमुळे अडचणी येत असून शासनाने वाळू उपस्याचा लिलाव करण्यासाठी तयार केलेली यादीस मा.न्यायालयाने त्यावर स्थगिती आणल्याने सदर यादी रद्द करावी लागली, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन वाळू घाट लिलावास सुरुवात करुन वाळू उपलब्ध करुन देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२६-०८-२०१९) :** (१) व (२) अशी बाब निदर्शनास आली नाही.

(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पोखरण रोड (जि.ठाणे) परिसरातील खेळाच्या मैदानासाठी आरक्षित असलेल्या भूखंडावर बेकायदेशीर दफनविधी करण्यात आल्याबाबत

**(३३) ४७१६६ (१२-०७-२०१९). डॉ.(श्रीमती) मनिषा कायंदे, श्री.रविंद्र फाटक, ॲड.अनिल परब :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पोखरण रोड (जि.ठाणे) परिसरातील निवासी संकुलांच्या मधोमध खेळाच्या मैदानासाठी आरक्षित असलेल्या भूखंडावर ९५ वर्षीय ए जेसीया, माजी सैनिक यांचा बेकायदेशीर दफनविधी करण्यात आल्याची बाब माहे मार्च, २०१९ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर प्रकरणी ठाणे महानगरपालिका आणि पोलीस आयुक्त यांच्याकडे स्थानिक रहिवाश्यांनी पत्रव्यवहार करून सदर बाब निदर्शनास आणली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, तद्नुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२१-०८-२०१९) :** (१) व (२) पोखरण रोड येथील निवासी संकुलांच्या मधोमध खेळाच्या मैदानासाठी आरक्षित असलेल्या भूखंडावर ९५ वर्षीय ए जेसीया, माजी सैनिक यांचा बेकायदेशीर दफनविधी करण्यात आल्याची बाब खरी आहे.

तथापि, सदर जागा निवासी विभागात येत असून, याबाबत खातरजमा करण्याची कार्यवाही उप अधिक्षक, भुमिअभिलेख यांच्या विभागामार्फत सुरु असल्याचे ठाणे महानगरपालिकेने कळविले आहे.

(३) सदर प्रकरणी दिनांक २०/०३/२०१९ रोजी वर्तक नगर पोलीस ठाण्यात गुन्हा रजिस्टर नं. II, ८८/२०१९ दाखल केला आहे. तसेच सदर प्रकरण न्याय प्रविष्ट आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पाणी टंचाई ग्राहकांना टँकरद्‌वारे पाणीपुरवठा करण्याबाबत

**(३४) ४७१९६ (०५-०७-२०१९). श्री.अमरिशभाई पटेल, श्री.शरद रणपिसे,**

**श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, अॅड.हुस्नबानू खलिफे, श्री.आनंदराव पाटील, डॉ.सुधीर तांबे, श्री.हरिसिंग राठोड, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.मोहनराव कदम, डॉ.वजाहत मिर्झा, श्री.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **पाणीपुरवठा व स्वच्छता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) शासनाने सुरु केलेली जलयुक्त शिवार योजना अपयशी ठरली असून राज्यात तीव्र पाणी टंचाई असतानाही पाणी टंचाई ग्राहकांना टँकर पुरवले जात नसल्याचे दिनांक २३ फेब्रुवारी, २०१९ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन पाणी टंचाई ग्राहकांना टँकरद्वारे पाणीपुरवठा करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.बबनराव लोणीकर (१४-०८-२०१९) :** (१) हे खरे नाही.

(२) पाणी टंचाई उपाययोजनेंतर्गत दिनांक २२ फेब्रुवारी, २०१९ च्या साप्ताहिक टँकर अहवालानुसार राज्यात २०१९ गावे व ४५९२ वाड्यांमध्ये एकूण २४३५ टँकरद्वारे पाणीपुरवठा करण्यात आला.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## यवतमाळ जिल्हयातील सार्वजनिक बांधकाम खात्यातील विविध कामांचे खाजगीकरण करण्यात येऊन काही विभाग बंद करण्यात येत असल्याबाबत

**(३५) ४७२२६ (०५-०७-२०१९). श्री.गोपिकिशन बाजोरीया :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) यवतमाळ जिल्हयातील सार्वजनिक बांधकाम विभागातील विविध कामांचे खाजगीकरण केले जात असून काही विभाग बंद करण्यात येत असल्याचे माहे एप्रिल, २०१९ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, रस्ते प्रकल्प (आरपी) हा विभागही बंद करण्यात आला आहे,

हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सार्वजनिक बांधकाम विभागाचा रस्ते प्रकल्प हा महत्वाचा विभाग असतानाही सदर विभाग बंद करण्याची कारणे काय आहेत, सदर प्रकरणी शासन फेरविचार करणार आहे काय,
(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२७-०८-२०१९) :** (१) व (२) हे खरे नाही.
(३), (४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## परभणी जिल्ह्यातील अवैध वाळू उपसा रोखण्याबाबत

**(३६) ४७२८३ (०५-०७-२०१९). श्री.विप्लव बाजोरिया :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) परभणी जिल्ह्यासह सर्व तालुक्यातील लिलाव झालेल्या वाळू धक्क्यांचे क्षेत्रफळ सोडून अवैधरित्या बेसुमार वाळूचा उपसा होत असल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त ठिकाणी बसविण्यात आलेले कॅमेऱ्याची नजर चुकवून राजरोसपणे वाळू उपसा होत असून सदरहू वाळू उपसाकडे प्रशासनाकडून दुर्लक्ष केले जात आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन अवैधरित्या वाळू उपसा करणाऱ्यांवर तसेच, त्यांना सहकार्य करणाऱ्या अधिकारी/कर्मचारी यांच्यावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२६-०८-२०१९) :** (१), (२) व (३) परभणी जिल्ह्यातील मौजे काजळी रोहिणा, ता.सेलू व मौजे गोगलगाव, ता.मानवत येथे हद्दीच्या बाहेर उत्खनन झाल्याचे निदर्शनास आले आहे. तसेच मौजे उखळद,

ता.परभणी, मौजे पार्डी, ता.मानवत व मौजे मुदगल, ता.पाथरी येथील वाळूगटाच्या मोजणी अहवालानुसार अतिरिक्त उत्खनन झाल्याचे निदर्शनास आले आहे. त्यामुळे संबंधित लिलावधारकांचा खुलासा मागविण्यात आला असून खुलाश्याअंती प्रचलित नियमानुसार दंडात्मक कारवाई प्रस्तावित करण्यात येईल.

सन २०१८-१९ मध्ये परभणी जिल्ह्यातील लिलावात गेलेल्या वाळूगटांची सीसीटीव्ही फुटेजची वेळोवेळी पाहणी करण्यात येत असून सीसीटीव्ही कॅमेऱ्याची नजर चुकवून राजरोसपणे वाळूचे अवैध उत्खनन होत असल्याची बाब निदर्शनास आली नाही.

परभणी जिल्ह्यातील वाळूघाटांची वेळोवेळी ड्रोनद्वारे पहाणी करुन वाळूघाटातून वाळूचे अवैध उत्खनन व वाहतुकीवर नियंत्रण ठेवण्यात येते.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## परभणी जिल्ह्यातील रेशीम योजनेत मनुष्यबळाचा अभाव असल्याबाबत

**(३७) ४७३०२ (०६-०७-२०१९). श्री.विप्लव बाजोरिया :** सन्माननीय **वस्त्रोद्योग मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) परभणी जिल्ह्यातील महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत राबविल्या जाणाऱ्या रेशीम योजनेत मनुष्यबळाचा अभाव असल्याचे माहे एप्रिल, २०१९ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मनुष्यबळाच्या अभावामुळे दुष्काळी परिस्थितीत वरदान ठरणारा रेशीम उद्योग अडचणीत सापडल्यामुळे लाभार्थ्यांना अनेक अडचणीचा सामना करावा लागत आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, जिल्ह्यासाठी किमान ८ टीएसपीची आवश्यकता असताना ३ टीएसपी उपलब्ध असून उर्वरित टीएसपी उपलब्ध करुन देण्याबाबत जिल्हाधिकाऱ्यांकडे पत्रव्ययवहार करुनही टीएसपी उपलब्ध झालेली नाही, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, जिल्हा रेशीम अधिकारी कार्यालयात रेशीम अधिकाऱ्यांचे एक पद व क्षेत्र सहायकाचे एक पद रिक्त आहे, हे ही खरे आहे काय,
(५) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने मनुष्यबळाचा अभाव दुर करण्याच्यादृष्टीने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (२६-०८-२०१९) :** (१) व (२) एप्रिल, २०१९ मध्ये जिल्हा रेशीम कार्यालय, परभणी या कार्यालयातील रेशीम विकास अधिकारी, श्रेणी-२ व क्षेत्र सहायक अशी एकूण दोन पदे रिक्त होती. तथापि, कार्यालयातील वरिष्ठ तांत्रिक सहायक यांचेकडे रेशीम विकास अधिकारी, श्रेणी-२ या पदाचा पदभार सोपवून महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गतची कामे करण्यात आली आहेत.
(३) नाही, जिल्हाधिकारी, परभणी यांनी ऑक्टोबर, २०१८ मध्ये जिल्हा रेशीम कार्यालय, परभणी या कार्यालयास ८ टीएसपी (टेक्निकल सर्व्हिस पर्सन) उपलब्ध करुन दिले आहेत.
(४) व (५) जिल्हा रेशीम कार्यालय, परभणी या कार्यालयातील रेशीम विकास अधिकारी, श्रेणी-२ हे पद बदली झाल्यामुळे तसेच, क्षेत्र सहायकाने स्वेच्छानिवृत्ती घेतली असल्याने सदर पदे रिक्त झाली आहेत. तथापि, तेथे वरिष्ठ तांत्रिक सहायक यांच्या सहाय्याने सर्व कामकाज करण्यात येत आहे.

रेशीम संचालनालयातील पदांच्या आकृतीबंधास मान्यता घेण्याबाबत कार्यवाही सुरू आहे. दरम्यान, कंत्राटी तत्त्वावर रेशीम तांत्रिक सहायकांची पदे भरण्यास शासन मान्यता देण्यात आली आहे.

---

## रसायन तंत्रज्ञान संस्था, माटुंगा (आयसीटी) या अभिमत विद्यापीठात एकाच व्यक्तीला कंत्राट दिल्याबाबत

**(३८) ४७३७७ (०५-०७-२०१९). श्री.हरिसिंग राठोड :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) रसायन तंत्रज्ञान संस्था, माटुंगा (आयसीटी) या राज्य शासनाच्या अखत्यारीत असलेल्या अभिमत विद्यापीठात २५ वर्षापासून कार्यरत प्रा.अरविंद लाली व त्यांची पत्नी यांच्या विद्यान बायोकॉमर्स प्रा.लीला आयसीटीकडून कोट्यवधी रुपयांचे कंत्राट देण्यात आल्याचे माहे जानेवारी-फेब्रुवारी, २०१९ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, शासनाने आयसीटीसाठी निश्चित केलेल्या परिनियमानुसार संस्थेतील शिक्षक, संस्थेशी निगडीत कोणताही व्यापार, धंदा, खाजगी शिकवणीत सहभागी होऊ शकत नाही, असे असताना प्रा.लाली यांना २५ वर्षापासून कोट्यवधीचे कंत्राट दिले, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२०-०८-२०१९) :** (१) नाही.
(२) संस्थेस लागू असलेल्या परिनियमाच्या २४ (f) च्या तरतुदींचे पालन करणे हे संस्थेतील प्रत्येक प्राध्यापक व कर्मचारी यांचे कर्तव्य आहे.

प्रा.लाली यांना २५ वर्षापासून कोट्यवधींचे कंत्राट देण्यात आले नाही.
(३) व (४) या प्रकरणी रसायन तंत्रज्ञान संस्थेने चौकशी समिती नेमून पुढीलप्रमाणे कार्यवाही केली आहे.

अ) प्रा.लाली यांना संस्थेच्या खरेदी प्रक्रियेपासून अलिप्त करण्यात आले.

ब) तसेच त्यांच्याकडून संशोधन केंद्राचा कार्यभार त्वरित काढून घेण्यात आला.

क) प्रा.लाली यांनी स्थापन केलेल्या खाजगी कंपनीस संस्थेच्या काळ्या यादीत टाकण्यात आले आहे.

ड) संस्थेच्या कंत्राटाद्वारा प्रा.लाली व त्यांच्या कुटुंबाने मिळविलेल्या नफ्याची वसुली सुरु करण्याची कार्यवाही सुरु करण्यात आली आहे.

---

## नागपूर जिल्हा परिषदेंतर्गत जलयुक्त शिवाराच्या कामात गैरव्यवहार झाल्याबाबत

**(३९) ४७४५६ (०५-०७-२०१९). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.रामदास आंबटकर :** सन्माननीय **जलसंधारण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नागपूर जिल्ह्यात जलयुक्त शिवाराच्या कामात गैरव्यवहार झाल्याची तक्रार नागरिकांनी व लोकप्रतिनिधींनी जिल्हा परिषदेकडे केली होती, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या प्रकरणाची चौकशी करण्याचे आदेश अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी श्री.अंकुश केदार, जि.प. नागपूर यांनी दिले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) तसेच, चौकशीचा अहवाल येईपर्यंत सदरहू कामाचे बिल प्रलंबित ठेवण्याचा निर्णय जिल्हा परिषदेने घेतला असून सदर चौकशी अहवाल प्राप्त झाला आहे काय,

(४) असल्यास, चौकशी अहवालाचे थोडक्यात स्वरुप काय आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. तानाजी सावंत (२८-०८-२०१९) :** (१), (२), (३) व (४) लोकप्रतिनिधींनी केलेल्या तक्रारीच्या अनुषंगाने याप्रकरणी अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.नागपूर यांनी तपासणी पथकाचा अहवाल प्राप्त झाल्याशिवाय देयके पारित करण्यात येऊ नयेत अशा सूचना दिनांक २८/३/२०१९ च्या परिपत्रकान्वये दिल्या होत्या.

तथापि, जलयुक्त शिवार अभियानाच्या कामांचे त्रयस्थ संस्थेमार्फत मूल्यमापन करण्यात येत असल्याने तसेच कामे सुरू करण्यापूर्वी, काम सुरू असताना व काम संपल्यानंतरचे फोटोग्राफ व जिओ टॅगींग जलयुक्त शिवार अभियानाच्या संकेतस्थळावर उपलब्ध आहेत. त्यामुळे अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.नागपूर यांनी त्यांचे परिपत्रक दिनांक ३०/३/२०१९ अन्वये विहित अटीच्या अधीन राहून देयक पारित करण्याच्या सूचना दिल्या आहेत.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील लघु व मध्यम उद्योग बंद पडत असल्याबाबत

**(४०) ४७७५१ (०६-०७-२०१९). डॉ.सुधीर तांबे, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण, श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **उद्योग मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात गेल्या दोन शतकात सुमारे ४५ हजार लघु व मध्यम उद्योग बंद पडल्याचे माहे सप्टेंबर, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त बंद पडलेल्या उद्योगांमुळे राज्यात सुमारे २२ लाख पेक्षा जास्त कामगार बेरोजगार झाले आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार राज्याच्या उद्योगातील गुंतवणूक आणि रोजगार वाढीसाठी कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देसाई (२०-०८-२०१९) :** (१) हे खरे नाही.

चौथ्या औद्योगिक प्रगणनेच्या अहवालानुसार माहे मार्च, २००७ अखेर राज्यात बंद असलेल्या उद्योगांची संख्या ३४३२७ इतकी आहे. त्यानंतर औद्योगिक प्रगणना झालेली नाही.

(२) हे खरे नाही.

राज्यातील बंद पडलेल्या उद्योगांमध्ये सुमारे १,२३,८७७ इतके कामगार बेरोजगार झालेले आहेत.

(३) व (४) बंद उद्योगांना उर्जितावस्थेत आणण्यासाठी शासनाकडून वेळोवेळी उपाययोजना करण्यात येतात. महाराष्ट्र औद्योगिक धोरण २०१३ नुसार पुनरुज्जीवनक्षम नसलेल्या तसेच बंद असलेल्या उपक्रमांना सुलभ निर्गमन पर्याय उपलब्ध होऊन, बंद उद्योग पुन्हा सुरु होण्यासाठी महाराष्ट्र शासनाने शासन निर्णय दिनांक २ मे, २०१३ अन्वये विशेष अभय योजना जाहीर केली होती. सदर योजनेंतर्गत जे उद्योग घटक विहित कार्यपध्दतीत योग्य ते निकष पूर्ण करतील अशा उद्योग घटकांना विशेष अभय योजनेद्वारे सुलभ

निर्गमन पर्याय उपलब्ध करुन देण्यात आला आहे. सदर योजनेमध्ये पात्र ठरणाऱ्या घटकाने राज्य शासनाची सर्व मुद्दलाची रक्कम एक रकमी भरल्यास व्याज व दंडव्याज माफ करण्याची तरतूद आहे. सदर योजनेस शासन निर्णय दिनांक ६ मे, २०१६ अन्वये दिनांक ३१ मार्च, २०१७ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

रोजगार निर्मितीस चालना देण्यासाठी व उद्योगांची कार्यक्षमता सुधारण्यासाठी राज्यात सामुहिक प्रोत्साहन योजना सन १९६४ पासून सुरु करण्यात आली. या योजनेत वेळोवेळी बदल व सुधारणा करण्यात आल्या आहेत. सामुहिक प्रोत्साहन योजनेचा समावेश राज्याचे नवीन औद्योगिक धोरण २०१९ मध्ये देखील करण्यात आला आहे.

प्रचलित सामुहिक प्रोत्साहन योजना २०१३ अंतर्गत जिल्हयातील तालुक्यांची त्यांच्या औद्योगिक विकासाच्या प्रतवारीप्रमाणे अ,ब,क,ड,ड+ आणि विना उद्योग जिल्हा व नक्षलग्रस्त क्षेत्र अशा सात गटात विभागणी करण्यात आली आहे. राज्यातील सुक्ष्म, लघु, मध्यम व मोठ्या उद्योगांना योजनेतील तालुका वर्गवारीनुसार विहित मर्यादेपर्यंत औद्योगिक प्रोत्साहन अनुदान, व्याज अनुदान, विद्युत शुल्क माफी, मुद्रांक शुल्क माफी, विद्युत कर अनुदान, सुक्ष्म, लघु व मध्यम उद्योगांचे सक्षमीकरण, गुणात्मक स्पर्धा, संशोधन व विकास कार्य आणि तांत्रिक श्रेणीमध्ये वाढ, इ. प्रोत्साहनांचा लाभ देय आहे. तसेच विशाल व अतिविशाल घटकांना शासनाने देकार पत्रामध्ये देवू केलेली प्रोत्साहने देण्यात येतात.

प्रचलित सामुहिक प्रोत्साहन योजना २०१३ अंतर्गत अविकसित भागात जास्तीत जास्त गुंतवणूक होऊन उद्योगांना या योजनेतील प्रोत्साहनांचा जास्तीत जास्त लाभ मिळावा व या योजनेकडे जास्तीत जास्त उद्योग आकर्षित होऊन रोजगाराच्या जास्तीत जास्त संधी उपलब्ध व्हाव्यात या उद्देशाने राज्यातील एकूण ३५५ तालुक्यांपैकी २७९ तालुक्यांना ड+ दर्जा देण्यात आला आहे.

राज्यात गुंतवणूक वाढीच्या खालील नवीन योजना जाहीर केल्या आहेत.

१) माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण २०१५

२) राज्याचे किरकोळ व्यापार धोरण

३) भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर विशेष सामुहिक प्रोत्साहन योजना दिनांक ११ फेब्रुवारी, २०१६

४) महाराष्ट्र इलेक्ट्रॉनिक्स धोरण २०१६, दिनांक ११ एप्रिल, २०१६

५) राज्यातील महिला उद्योजकांसाठी विशेष धोरण दिनांक १४ डिसेंबर, २०१७

६) अवकाश व सरंक्षण क्षेत्र उत्पादन धोरण-२०१८, दिनांक १४ फेब्रुवारी, २०१८

७) महाराष्ट्र इलेक्ट्रीक व्हेईकल प्रोत्साहन धोरण-२०१८, दिनांक १४ फेब्रुवारी, २०१८

८) महाराष्ट्र काथ्या धोरण-२०१८, दिनांक १५ फेब्रुवारी, २०१८

तसेच गुंतवणूकदारांना आकर्षित करण्यासाठी मेक इन इंडिया ही परिषद तसेच मॅग्नेटिक महाराष्ट्र कन्व्हर्जन्स आयोजित केला होता.

उद्योग विभागाच्या शासन निर्णय, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये सुधारित खरेदी धोरण लागू करण्यात आले आहे. सदर धोरणानुसार मध्यवर्ती भांडार खरेदी संघटनेची दरकरार पध्दती संपूष्टात आणली असून रु.०३.०० लक्ष वरील खरेदीकरीता ई-निविदा कार्यपध्दती बंधनकारक करण्यात आली आहे. सदर खरेदी धोरणामध्ये अभिव्यक्ती स्वारस्य पध्दतीने खरेदी, स्वीस चॅलेंज खरेदी पध्दती, इ. नाविन्यपूर्ण खरेदी पध्दतीचा समावेश करण्यात आला आहे. मध्यवर्ती भांडार खरेदी संघटनेमार्फत अंध, अपंग यांच्या संस्था व हातमाग महामंडळ / महासंघ (महाटेक्स) यांनी उत्पादित केलेल्या वस्तूंची दरनिश्चिती, दोन किंवा अधिक प्रशासकीय विभागांना लागणाऱ्या वस्तूंची खरेदी व शासकीय खरेदीच्या संदर्भात धोरण आखणी करण्याची जबाबदारी ठेवण्यात आली आहे.

सुधारित खरेदी धोरणामध्ये सुक्ष्म व लघु उद्योगांमार्फत खरेदी करण्यासाठी २४१ वस्तू राखीव ठेवण्यात आल्या आहेत. राखीव वस्तूंची १०० टक्के खरेदी सुक्ष्म व लघु उद्योगामार्फत करताना, त्यापैकी २० टक्के खरेदी अनुसूचित जाती / अनुसूचित जमातीच्या उद्योजकांसाठी राखीव ठेवण्यात आली आहे. खरेदीसाठी राखीव नसलेल्या वस्तूबाबत २० टक्के खरेदी सुक्ष्म व लघु उद्योगांसाठी न्युनतम (एल-१) दराने राखीव ठेवण्यात आली असून, या २० टक्के पैकी ४ टक्के खरेदी अनुसूचित जाती / अनुसूचित जमातीच्या उद्योजकांसाठी राखीव ठेवण्यात आली आहे.

---

## राज्यात लोकसभा निवडणूकीत निवडणूक अधिकारी म्हणून नियुक्त केलेल्या कर्मचाऱ्यांना मिळणाऱ्या भत्त्याबाबत

**(४१) ४७७८१ (१०-०७-२०१९). श्री.बाळाराम पाटील, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.किशोर दराडे, डॉ.सुधीर तांबे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्य शासकीय व निमशासकीय कर्मचाऱ्यांची माहे एप्रिल महिन्यात लोकसभा निवडणूक अधिकारी म्हणून नियुक्ती केली होती, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, निवडणूक आयोगाने निवडणूक अधिकाऱ्यांना मिळणारा भत्ता अगोदर जाहीर करूनही निवडणुकीची ड्युटी करणाऱ्या कर्मचाऱ्यांना देण्यात आलेला भत्ता राज्यात वेगवेगळ्या भागात वेगवेगळा दिल्याच्या तक्रारी शासनास प्राप्त झालेल्या आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन नियमाप्रमाणे निवडणूक भत्ता न देणाऱ्या अधिकाऱ्यांची चौकशी करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२७-०८-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) अंशत: खरे आहे.

राज्यात लोकसभा सार्वत्रिक निवडणूक-२०१९ च्या कामासाठी नियुक्त अधिकारी / कर्मचारी यांना दिनांक १८ मार्च, २०१४ च्या शासन निर्णयाप्रमाणे निवडणूक भत्ता देण्यात आला आहे. तथापि, सोलापूर जिल्ह्यातील अक्कलकोट व दक्षिण सोलापूर तालुका प्राथमिक शिक्षण संघ व महाराष्ट्र राज्य आदर्श शिक्षक समिती, जिल्हा सोलापूर यांनी जिल्हाधिकारी, सोलापूर यांच्याकडे निवडणूक अधिकारी / कर्मचारी यांना वेगवेगळा भत्ता दिल्याचे निवेदन दिले आहे.

(३) सोलापूर जिल्ह्यात ज्या ठिकाणी अधिकारी / कर्मचारी यांचेकरीता भोजनाची व्यवस्था करण्यात आली, त्या ठिकाणी सदर शासन निर्णयानुसार

रुपये १५०/- आहार भत्ता कमी करुन निवडणूक भत्ता देण्यात आला. याबाबत शंका निरसन करण्यात आले आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## ओयो या रूमसेवा पुरवठादार कंपनीला आंदोलनाचा इशारा दिल्याबाबत

**(४२) ४७९०१ (१०-०७-२०१९). ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नियमबाह्य रूमसेवा पुरविण्याचा ठपका ठेवत देशातील हॉटेल व्यावसायिकांच्या संघटनेने ओयो या रूमसेवा पुरवठादार कंपनीला आंदोलनाचा इशारा दिल्याचे माहे फेब्रुवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, ओयोकडून अवैध परवाना नसलेले बेड, ब्रेकफास्टची सोय दिली जात आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आली आहे काय, चौकशीचे निष्कर्ष काय आहेत व त्यानुसार सदरहू कंपनीवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२३-०८-२०१९) :** (१) हे खरे नाही.
(२) प्रश्न उद्भवत नाही.
(३) प्रश्न उद्भवत नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## जलयुक्त शिवार योजनेतील त्रृटींबाबत

**(४३) ४८०५७ (०५-०७-२०१९). श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, श्री.रामहरी रुपनवर, ॲड.हुस्नबानू खलिफे, डॉ.सुधीर तांबे, आर्कि.अनंत गाडगीळ, डॉ.वजाहत मिर्झा, श्री.हरिसिंग राठोड,**

**श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.मोहनराव कदम, प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **जलसंधारण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) जलयुक्त शिवार योजनेतील त्रुटींचा अभ्यास करण्यासाठी माजी मुख्य सचिव जॉनी जोसेफ यांच्या अध्यक्षतेखाली तज्ञ समितीने आपला अहवाल माहे जून, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान सादर केला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त समितीच्या अहवालात जलयुक्त शिवार योजनेत अनेक त्रुटी असल्याचे दर्शविण्यात आल्या असून सदर अहवालात दर्शविण्यात आलेल्या त्रुटींचे स्वरुप काय आहे,

(३) असल्यास, समितीने सादर केलेल्या अहवालातील त्रुटी शासनाने मान्य केल्या आहेत, हे ही खरे आहे काय,

(४) तसेच, उक्त त्रुटींबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**डॉ. तानाजी सावंत (२८-०८-२०१९) :** (१), (२), (३) व (४) मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या निर्देशाच्या अनुषंगाने माजी मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या तज्ञ समितीने शासनास दिनांक १२/६/२०१८ रोजी अहवाल सादर केला असून समितीने जलयुक्त शिवार योजनेच्यासंदर्भात काही शिफारशी केलेल्या आहेत.

मा.उच्च न्यायालयाने तज्ञ समितीने केलेल्या शिफारशींच्या अंमलबजावणी संदर्भात मा.उच्च न्यायालयात प्रतिज्ञापत्र सादर करणेबाबत शासनास निर्देश दिले होते. त्यास अनुसरून शासनाने सदर शिफारशींवर केलेल्या कार्यवाहीबाबत मा.उच्च न्यायालयात दिनांक १७/६/२०१९ रोजी प्रतिज्ञापत्र सादर केले आहे.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील शासकीय जमिनींवरील बांधकामांना मुदतवाढ देण्याच्या निर्णयाबाबत

**(४४) ४८११४ (०५-०७-२०१९). श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, श्री.रामहरी रुपनवर, ॲड.हुस्नबानू खलिफे, डॉ.सुधीर तांबे, आर्कि.अनंत गाडगीळ, डॉ.वजाहत मिर्झा, श्री.हरिसिंग राठोड, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.मोहनराव कदम, प्रा.जोगेन्द्र कवाडे : तारांकित प्रश्न क्रमांक ४३९६६ ला दिनांक १९ नोव्हेंबर, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात:** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील विविध व्यक्ती, संस्था अथवा कंपनी यांना कब्जेहक्काने किंवा भाडे पट्टयाने दिलेल्या राज्यातील शासकीय जमिनीवरील बांधकामांना मुदतवाढ देण्याबाबत व त्यासंदर्भातील अधिमूल्यामध्ये कपात करण्याबाबत नवे धोरण राबविण्याबाबतचा निर्णय दिनांक २० फेब्रुवारी, २०१९ रोजी वा त्यासुमारास घेण्यात आला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, निर्णयाचे स्वरुप काय आहे, उक्त निर्णय घेण्यामागील कारणे काय आहेत, उक्त निर्णय घेण्यापूर्वी साधारणत: किती जमिनी कब्जेहक्काने किंवा भाडेपट्टयाने किती कालावधीसाठी देण्यात आल्याची शासनाकडे माहिती उपलब्ध झाली आहे काय,

(३) असल्यास, उक्त कब्जेहक्काने, भाडेपट्टयाने दिलेल्या जमिनींपैकी मोठ्या प्रमाणातील क्षेत्रफळाच्या जमिनींचा व त्यावरील व्यक्ती, संस्था अथवा कपंनी यांचा तपशील काय आहे,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२६-०८-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे. दिनांक १ मार्च, २०१९ रोजी यासंदर्भातील शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे.

(२) व (३) प्रदान करण्यात आलेल्या शासकीय जमिनींचा संबंधितांकडून शीघ्रगतीने वापर होऊन त्यातून राज्याचा सामाजिक व आर्थिक विकास व्हावा, या उद्देशाने सदर निर्णय घेण्यात आला आहे. हा निर्णय घेतांना जमिनीचे क्षेत्रफळ व भाडेपट्टा अथवा कब्जेहक्काचा कालावधी, या बाबी विचारात घेण्याऐवजी बांधकाम मुदतवाढीसाठी दिनांक ११/०१/२०१७ च्या शासन निर्णयान्वये आकारण्यात येणाऱ्या अधिमूल्याचा दर परवडणारा

नसल्यामुळे लोकप्रतिनिधी, विविध व्यक्ती/संस्था यांच्याकडून प्राप्त निवेदनांचा विचार करण्यात येऊन, बांधकाम मुदतवाढीसाठी आकारावयाच्या अधिमुल्याच्या दरांमध्ये सुधारणा करण्यात आली आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## वसई-विरार महानगरपालिकेच्या आरोग्य विभागाने गोवर/रुबेला लसीकरण प्रमाणपत्राच्या छायांकित प्रतीचे लाभार्थांना दिल्याबाबत

**(४५) ४८२१० (१२-०७-२०१९). श्री.रविंद्र फाटक, ॲड.अनिल परब, श्री.विलास पोतनीस :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) वसई-विरार शहर महानगरपालिकेच्या आरोग्य विभागाने आपल्या कार्यक्षेत्रात गोवर/रुबेला लसीकरण केल्यानंतर लाभार्थांना मूळ प्रमाणपत्र देण्याऐवजी प्रमाणपत्राच्या छायांकित प्रतीचे (झेरॉक्स) वाटप केल्याचे माहे एप्रिल, २०१९ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, आरोग्य विभागाकडून देण्यात आलेल्या छायांकित प्रमाणपत्रांवर महानगरपालिकेचा शिक्का नसल्यामुळे हे प्रमाणपत्र ग्राहय धरणे अशक्य असून उक्त प्रकरणाची सविस्तर चौकशी करुन संबधितांवर कायदेशीर कारवाई करण्याची मागणी लोकप्रतिनिधींनी मा.सार्वजनिक आरोग्य मंत्र्यांकडे लेखी निवेदनाद्वारे दिनांक २ जानेवारी, २०१९ रोजी वा त्यासुमारास केली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले तद्नुसार संबंधितांविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२६-०८-२०१९) :** (१) व (२) होय, हे खरे आहे.

वसई-विरार शहर महानगरपालिका क्षेत्रात गोवर-रुबेला लसीकरण मोहिम दिनांक २६/११/२०१८ पासून राबविण्यात आली होती. सदर मोहिमेदरम्यान शासनाकडून ४,१२,१४५ इतके प्रमाणपत्र वसई-विरार शहर महानगरपालिकेस प्राप्त झाले होते.

वसई-विरार शहर महानगरपालिकेस प्राप्त आणि तद्नंतर छपाई केलेल्या प्रमाणपत्रांचा तपशिल खालीलप्रमाणे आहे :-

| अ.क्र. | तपशिल | दिनांक | छपाई |
|---|---|---|---|
| १ | MR Certificate (शासनाकडून प्राप्त) | ०२/११/२०१८ | ४,१२,१४५ |
| २ | MR Certificate (मनपाकडून छपाई) | १७/११/२०१८ | ३०,००० |
| ३ | MR Certificate (मनपाकडून छपाई) | २०/१२/२०१८ | ३२,००० |
| | **एकूण** | | **४,७४,१४५** |

तथापि, प्रमाणपत्रांच्या कमतरतेमुळे ६२,००० लाभार्थ्यांना महानगरपालिकेमार्फत तात्पुरत्या स्वरुपात प्रमाणपत्रांच्या छायांकित प्रती देण्यात आल्या होत्या. तथापि, त्यानंतर छायांकित प्रत मिळालेल्या सर्व लाभार्थ्यांना मूळ साक्षांकित प्रत उपलब्ध करून देण्यात आल्या असल्याचे वसई-विरार शहर महानगरपालिकेने कळविले आहे.

(३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## कुलाबा व दादर (मुंबई) सह राज्यातील इतर प्रलंबित असलेले नवीन तालुके निर्मितीबाबत

**(४६) ४८५५९ (०५-०७-२०१९). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.प्रविण दरेकर, श्री.रामदास आंबटकर, प्रा.जोगेन्द्र**

**कवाडे :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबई शहराच्या अखत्यारित कुलाबा आणि दादर हे दोन नवे तालुके निर्माण करण्याचा प्रस्ताव शासनाकडे अंतिम टप्प्यात असल्याची बाब माहे मे, २०१९ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, राज्यातील अनेक जिल्ह्यातील नवीन तालुके निर्माण करण्याचा प्रस्ताव अनेक वर्षापासून प्रलंबित आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, मुंबईतील या दोन नव्या तालुक्याच्या निर्मिती बरोबर राज्यातील इतर प्रलंबित असलेले नवीन तालुके निर्मितीचे सर्व प्रस्ताव शासन मान्य करणार आहे काय, या सर्व नव्या तालुक्यांची निर्मिती कधीपर्यंत करण्यात येणार आहे,
(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कुलाबा व दादर (मुंबई) सह राज्यातील इतर प्रलंबित असलेले नवीन तालुके निर्मितीबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२८-०८-२०१९) :** (१) या संदर्भात प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.
(२), (३) व (४) तालुका निर्मितीचे निकष ठरविण्याबाबत गठीत केलेल्या समितीचा अहवाल शासनास प्राप्त झाला आहे. सदर अहवालाची तपासणी करुन तालुका निर्मितीबाबत निकष निश्चित करण्याकामी धोरणात्मक निर्णय घेण्याच्या दृष्टीने प्रस्ताव मंत्रिमंडळाच्या मान्यतेसाठी सादर करण्याची प्रक्रिया सुरु आहे.

तालुका निर्मिती ही एक मोठी आर्थिक व प्रशासकीय प्रक्रिया आहे. त्यानुषंगाने विविध पैलू तपासून त्यासंदर्भात धोरण निश्चित झाल्यानंतर प्रकरणपरत्वे नवीन तालुका निर्मितीसंदर्भात उचित निर्णय घेण्याचे संकल्पित आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मु.पो.देवडे (ता.संगमेश्वर, जि.रत्नागिरी) येथील जमिनीत विनापरवाना उत्खनन करुन रस्ता केल्याबाबत

**(४७) ४८७८४ (०५-०७-२०१९). श्री.प्रविण दरेकर, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) रा.मु.पो.देवडे (ता.संगमेश्वर, जि.रत्नागिरी) येथील दिपक शांताराम बेर्डे यांच्या मालकीच्या जमिनीत (९२/१०, ८४-अ व १३-ब, ९४/२, १००/१, ८९/१७, ९०/१) या क्षेत्रात विनापरवाना जेसीबी मशिनने उत्खनन करुन मूळ पायवाट सोडून रस्ता केल्याची फेरचौकशी करण्यासंदर्भात दिलेल्या निवेदनानुसार कक्ष अधिकारी, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी दिनांक २०/२/२०१९ रोजी जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांना फेरचौकशी करुन अहवाल शासनास सादर करण्याचे आदेश देण्यात आले होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या आदेशानुसार फेरचौकशीचा अहवाल शासनास सादर करण्यात आला आहे काय, त्यात काय आढळून आले, या प्रकरणाची सद्य:स्थिती काय आहे,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२६-०८-२०१९) :** (१) हे खरे आहे.

(२) व (३) सदर प्रकरणी करण्यात आलेल्या फेरचौकशीमध्ये मौजे देवडे येथील धुमकवाडी ते ढोरांबे (म्हसोबा) विठ्ठलाई देवस्थानपर्यंत सुमारे ३.५ कि.मी. पर्यंत क्षेत्रामध्येच पूर्वापार वहिवाटीच्या रस्त्यावर उत्खनन केलेली माती पसरविण्यात आली असल्याचे निष्पन्न झाले आहे. सदर उत्खनन केलेली माती ही त्याच रस्त्यासाठी वापरली असून सदर मातीची विक्री झालेली नाही.

तथापि, सदर जमिनीमध्ये उत्खनन करुन पूर्वापार वहिवाटीच्या रस्त्यावर माती पसरविण्यात आल्याने रस्त्याच्या लगत असणारी जंगली झाडांचे नुकसान झाल्याबाबत वन विभागामार्फत रितसर चौकशी करण्यात आली आहे. परिमंडळ वन अधिकारी, संगमेश्वर यांनी वृक्षतोड करणाऱ्या संबंधिताविरुध्द कारवाई करुन रुपये १०,०००/- दंडात्मक रक्कम वसूल केली आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सार्वजनिक आरोग्य विभागातील डॉक्टरांचे सेवानिवृत्तीच्या वयात वाढ करण्याबाबत

**(४८) ४८८४६ (०५-०७-२०१९). श्री.प्रविण दरेकर, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.नागोराव गाणार** : सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सार्वजनिक आरोग्य विभागातील डॉक्टरांचे सेवानिवृत्तीचे वय ६५ करणेबाबत लोकप्रतिनिधींनी दिनांक ८/०३/२०१९ रोजी वा त्यासुमारास मा.सार्वजनिक आरोग्य मंत्री यांना लेखी निवेदन दिले होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (२९-०८-२०१९)** : (१) हे खरे आहे. मा.लोकप्रतिनिधींकडून विविध दिनांकास निवेदने प्राप्त झाली आहेत.

(२) सार्वजनिक आरोग्य विभागांच्या अधिपत्याखालील आरोग्य सेवा संचालनालयातील महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील संचालक, अतिरिक्त संचालक, सहसंचालक, उपसंचालक व जिल्हा आरोग्य अधिकारी यांचे कार्यालयाचा तसेच राज्य कामगार विमा योजना कार्यालयातील महाराष्ट्र वैद्यकीय विमा सेवा, गट-अ मधील संचालक (वैद्यकीय), उपसंचालक (वैद्यकीय) व वैद्यकीय अधिक्षक (उच्चश्रेणी), वैद्यकीय अधिक्षक (निम्नश्रेणी) यांचा समावेश प्रशासनिक सेवेमध्ये करण्यात येत असून, सदर ठिकाणी कार्यरत असणाऱ्या अधिकाऱ्यांचे (सेवानिवृत्तीचे सध्याचे वय ६० वर्षे दिनांक ३१/०५/२०२३ पर्यंत) सेवानिवृत्तीचे वय न वाढविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. तसेच सदर पदावरील अधिकारी वगळता आरोग्य सेवा संचालनालयांतर्गत महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ (६ व्या वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी रुपये १५६००-३९१०० ग्रेड पे रुपये ५४०० व त्यावरील सर्व) व राज्य कामगार विमा योजना कार्यालयातील

महाराष्ट्र वैद्यकीय विमा सेवा, गट-अ मधील (६ व्या वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी रुपये १५६००-३९१०० ग्रेड पे रुपये ५४०० व त्यावरील सर्व) जे वैद्यकीय अधिकारी थेट रुग्णसेवा देतात त्या अधिकाऱ्यांचे सेवानिवृत्तीचे वय २ वर्षासाठी ६० वरुन ६२ वर्षापर्यंत (दिनांक ३१/०५/२०२१ पर्यंत) (दिनांक ३१/०५/२०१९ पासून पूर्वलक्षी प्रभावाने) वाढविण्यासंबंधीचा प्रस्ताव मा.मंत्रिमंडळासमोर सादर करण्याच्या अटीच्या अधीन राहून त्यांच्या वयाची ६२ वर्षे पूर्ण होईपर्यंत त्यांना शासन सेवेत ठेवण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मानखुर्द येथील ललुभाई कम्पाऊंड मधील सदनिकाधारकांना घर खाली करण्याकरीता दिलेल्या खोट्या नोटीसाबाबत

**(४९) ४९११८ (१२-०७-२०१९). श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मानखुर्द येथील ललुभाई कम्पाऊंड मधील सदनिकाधारकांना श्री.धनगर व श्री.वाघमारे समाज सेवा अधिकारी, एमएमआरडीए हे सदर सोसायटीच्या सचिवांच्या तसेच कर्सन, अमित व इतर दलालांच्या संगनमताने बोगस नोटीस देऊन घर खाली करण्याच्या धमक्या देत आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, याबाबत एमएमआरडीए प्रशासनाकडे वेळोवेळी तक्रार करुन तसेच नोटीसला उत्तर देऊनही उक्त प्रकरणी कोणताच निर्णय घेण्यात आलेला नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर प्रकरणी शासनाने चौकशी करुन संबंधित दोषी अधिकाऱ्यांवर कारवाई करुन सदनिकाधारकांना दिलेल्या खोट्या नोटीसा शासनाकडून मागे घेण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१७-०९-२०१९) :** (१) हे खरे नाही, एमयुटीपी - २ बी अंतर्गत मुंबई सेंट्रल ते बोरीवली ६ व्या अतिरिक्त पश्चिम रेल्वेमार्गिका

प्रकल्पांतर्गत बाधित झालेल्या एकूण ६०७ प्रकल्पग्रस्तांपैकी २९० प्रकल्पग्रस्तांचे मानखुर्द येथील एस. व्ही. पटेल पुनर्वसन वसाहतीतील इमारत क्रमांक २९ मध्ये कायमस्वरुपी पुनर्वसन करण्यात आले. त्यापैकी दोन प्रकल्पग्रस्तांनी सदनिकांचा दुबार लाभ घेतला असल्याचे निष्पन्न झाल्याने सदर सदनिकाधारकांना नोटीस देण्यात आल्या आहेत.

(२) हे खरे नाही,

प्रकरणाधीन व्यक्तींनी सादर केलेले खुलासे कायदेशीर तपासणीअंती मान्य करण्याजोगे नसल्याने संबंधित वितरणपत्रे रद्द करण्यात आली असून, सदर सदनिका निष्कासित करुन ताब्यात घेण्याची प्रक्रिया प्रगतीपथावर आहे.

(३) व (४) सदर प्रकरणी खोटया नोटीसा दिल्या नसून त्या मागे घेण्याचा तसेच अधिकाऱ्यांवर कार्यवाही करण्याचा प्रश्न उद्भवत नाही.

---

## कृषक विद्यालय वर्धा या शाळेत नियमबाह्य मान्यता देऊन शासनाला आर्थिक भुर्दंड बसल्याप्रकरणी चौकशी करण्याबाबत

**(५०) ५१८२९ (१५-०७-२०१४). श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सौ. विभा दाते सचिव, शेतकरी शिक्षण प्रसारक मंडळ कर्मचारी व्यावसायीक संस्था वर्धा यांनी कृषक विद्यालय वर्धा या शाळेत पदमान्यता नसताना श्रीमती कल्याणी अंबरकर यांना नियमबाह्य मान्यता देऊन शासनाला आर्थिक भुर्दंड बसल्याप्रकरणी सविस्तर माहिती प्रधान सचिव शालेय शिक्षण विभाग यांचेकडे चौकशीसाठी पाठविली हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय,

(३) असल्यास, चौकशी अहवाल काय आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.आशिष शेलार (१६-०७-२०१९) :** (१) हे खरे नाही.

(२), (३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

